अल्पसंख्यांक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या मुलींकरिता वसतीगृह बांधण्याकरिता निधी उपलब्ध करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
अल्पसंख्याक विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः वसगृ -२०१४/प्र.क्र. ७२/का.८
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख : ३१ मार्च, २०१५.

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्यांक विकास विभाग क्र. मौआम-२००९/प्र.क्र.१५/का.८, दि.०२.०३.२०१०
२) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्यांक विकास विभाग क्र. वसगृ-२०११/प्र.क्र.१३०/का.८, दि.२०.१२.२०११
३) समक्रमांकांचे शासन निर्णय दि.१६.६.२०१४, दि.०७.१०.२०१४, दि.१०.१२.२०१४ व दि.१२.२.२०१५.
४) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्यांक विकास विभाग क्र. वसगृ-२०१५/प्र.क्र.११/का.८, दि.२६.०२.२०१५.

प्रस्तावना -

राज्यातील सर्व जिल्हयांमध्ये अल्पसंख्यांक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थीनीसाठी वसतीगृहे बांधण्याबाबतचा शासन निर्णय समक्रमांक, दिनांक २ मार्च, २०१० रोजी निर्गमित करण्यात आला आहे. तसेच राज्यातील विविध विद्यापीठांमध्ये उपलब्ध असलेल्या जमिनीवर अल्पसंख्यांक मुलींसाठी वसतीगृह बांधण्यासंदर्भातील कार्यपध्दती दि.२०.१२.२०११ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आली आहे. कळमनुरी जि. हिंगोली, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद, जिल्हाधिकारी, अमरावती, शासकीय अध्यापक महाविद्यालय, पनवेल, जि. रायगड, स्वामी रामानंद तीर्थ विद्यापीठ, नांदेड यांच्या विनंतीनुसार बांधकामासाठी निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

तसेच शासन निर्णय दिनांक २६.०२.२०१५ अन्वये शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, जळगाव यांच्या आवारात अल्पसंख्यांक समाजातील विद्यार्थीनींसाठी वसतीगृह बांधण्यास वसतीगृहाच्या बांधकामासाठी रु.४.७५ कोटी इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास मान्यता देण्यात आली आहे. या अनुषंगाने या सर्व जिल्हयात अल्पसंख्यांक समाजातील मुलींच्या वसतीगृहाच्या बांधकामासाठी निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

कळमनुरी जि. हिंगोली, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद, अमरावती, शासकीय अध्यापक महाविद्यालय, पनवेल, जि. रायगड, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा

विद्यापीठ, नांदेड व शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, जळगांव या ठिकाणी अल्पसंख्यांक समाजातील मुलींच्या वसतीगृहाच्या बांधकामासाठी जिल्हाधिकारी, हिंगोली, औरंगाबाद, अमरावती, जळगांव, नांदेड व रायगड यांना खालीलप्रमाणे तरतूद वितरीत करण्यास याव्दारे मान्यता देत आहे -

| अ. क्र. | वसतीगृहाचे ठिकाण | जिल्हाधिकारी | वितरीत करावयाची तरतूद रुपये कोटीत |
|---|---|---|---|
| १ | कळमनुरी, जि. हिंगोली | हिंगोली | १,५०,०००००/- ( रुपये एक कोटी पन्नास लाख फक्त) |
| २ | डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद | औरंगाबाद | ५४,६८,०००/- ( रुपये चोपन्न लाख अडूसष्ट हजार फक्त) |
| ३ | अमरावती | अमरावती | ३६,००,०००/- ( रुपये छत्तीस लाख फक्त) |
| ४ | शासकीय अध्यापक महाविद्यालय, पनवेल, जि. रायगड | रायगड | २०,००,०००/- ( रुपये वीस लाख फक्त) |
| ५ | स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड | नांदेड | ६०,००,०००/- ( रुपये साठ लाख फक्त) |
| ६ | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, जळगांव | जळगांव | २५,००,०००/- ( रुपये पंचवीस लाख फक्त) |
| **एकूण** | | | **३,४५,६८,०००/- ( रुपये तीन कोटी पंचेचाळीस लाख अडूसष्ट हजार फक्त)** |

२. जिल्हाधिकारी हिंगोली, औरंगाबाद, अमरावती, रायगड, नांदेड व जळगांव यांना सन २०१४-१५ करिता वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेली एकूण रु. ३,४५,६८,०००/- ( रुपये तीन चार कोटी वीस लाख अडूसष्ट हजार फक्त) इतकी रक्कम अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून आहरण व संवितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

३. सदर तरतूद जिल्हाधिकारी, हिंगोली, औरंगाबाद, अमरावती, रायगड, नांदेड व जळगांव यांचेकडे सूपुर्द करण्यात येत असून याकरीता संबंधित जिल्हाधिकारी “आहरण व संवितरण अधिकारी आणि त्यांनी प्राधिकृत केलेले दुय्यम अधिकारी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील.

४. सदर निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र संबधित जिल्हाधिकारी यांनी शासनास व महालेखापाल कार्यालयास सादर करावे तसेच अतिप्रदान व अखर्चित निधी परतावा शासनास भरणा (जमा )करण्याबाबत वित्त विभागाच्या दिनांक ०४ मार्च २०१५ रोजीच्या परिपत्रकातील सूचनानुसार संबधित जिल्हाधिकारी यांनी कार्यवाही करावी.

५. सदरचा खर्च करण्यास वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत C.V.C. च्या मार्गदर्शक तत्वानुसार / CAG च्या निदेशानुसार कोणताही शासन निर्णय/अटी व शर्तींचा भंग होणार नाही याची दक्षता जिल्हाधिकाऱ्यांनी यांनी घ्यावी. सदर रक्कम वितरीत करण्यापूर्वी जिल्हाधिकाऱ्यांनी यांनी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांचे

निरिक्षण अहवाल/वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा. तसेच सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील. सदर निधी कोणत्याही संस्थेत ठेव स्वरुपात जमा करता येणार नाही.

६. सदरचा खर्च मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०८) शहरातील अल्पसंख्यांक समाजातील वसतीगृहाकरिता सहायक अनुदान (२२३५ ए १४२), ३१ सहायक अनुदान ( वेतनेतर ) या लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय, नियोजन विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.१८९/१४७५, दि. २४.३.२०१५ व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.३०४/१५/व्यय-४ दि.३०.३.२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३११२३८१९८९१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Samir Ramesh Salunkhe

Digitally signed by Samir Ramesh Salunkhe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Samir Ramesh Salunkhe
Date: 2015.03.31 14:33:19 +05'30'

**( समीर साळुंखे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व अनुज्ञेयता),मुंबई/नागपूर
२. महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व परीक्षा ), मुंबई/नागपूर
३. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
४. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
५. जिल्हाधिकारी, हिंगोली, औरंगाबाद, अमरावती, रायगड, नांदेड व जळगांव
६. डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ,औरंगाबाद
७. संचालक, शासकीय विदर्भ ज्ञान विज्ञान संस्था, अमरावती
८. शासकीय अध्यापक महाविद्यालय, पनवेल, जि. रायगड
९. स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड
१०.शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, जळगांव
११.सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला, मुंबई

१२.अवर सचिव, का.७, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की त्यांनी उक्त रकमा संबंधिताना कृपया B.D.S. वर तात्काळ उपलब्ध करुन देण्यात याव्यात.

१३.जिल्हा कोषागार अधिकारी हिंगोली, औरंगाबाद, अमरावती, रायगड, जळगांव व नांदेड.

१४.वित्त विभाग (अर्थसंकल्प -१४, व्यय -४) मंत्रालय, मुंबई

१५.नियोजन विभाग (कार्या.१४७५)

१६.निवड नस्ती, का.८